**महसूल विभागातील महसूल, भूमि अभिलेख तसेच नोंदणी व मुद्रांक शुल्क कार्यालयासाठी एकत्रित प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३१३/ल-१.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०४ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ :-१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक ,आस्थापना-२००४/२४३९/प्र.क्र.४६८/म-१ , दि.०१.०९.२००४.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक समिती-२०११/प्र.क्र.९४/ल-१ सेल, दि.२५.०७.२०११
३) महसूल व वन विभाग, शासन शुद्धिपत्रक क्रमांक मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१९०/म-१ (धोरण), दि.०४.११.२०२०.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि. २९.१०.२००१.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-मातंस/नस्ती-२०१०/प्र.क्र.३४/३९, दि. १८.०६.२०१०.
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-मातंस-२०१०/प्र.क्र.४८/का.३९, दि. २९.०६.२०१०
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-सीओएम-१०९८/प्र.क्र.५१/९८/३९, दि. १५.०२.२००५.

**प्रस्तावना :-**

महसूल विभागातंर्गत विभागाच्या संगणकीकरणासाठी खुद्द महसूल व भूमि अभिलेख कार्यालयासाठी एक तसेच नोंदणी व मुद्रांक शुल्क यांच्या कार्यालयासाठी एक अशा दोन वेगवेगळ्या प्रकल्प अंमलबजावणी समिती असल्यामुळे आता संपूर्ण महसूल विभागासाठी एकच प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महसूल विभागातंर्गत खुद्द महसूल व भूमि अभिलेख आणि नोंदणी व मुद्रांक शुल्क या कार्यालयांच्या संगणकीकरणासाठी अस्तित्वात असणाऱ्या दोन्ही प्रकल्प अंमलबजावणी समित्यांचे एकत्रिकरण करून खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम. | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (महसूल) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ७ | नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ८ | सह/उप सचिव (म-१) | सदस्य |
| ९ | राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई | सदस्य |
| १० | संबंधित उप सचिव (महसूल), महसूल व वन विभाग (गरजेनुसार) | निमंत्रित |
| ११ | उपमहानिदेशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे (गरजेनुसार) | निमंत्रित |
| १२ | संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग सेंटर, नागपूर (गरजेनुसार) | निमंत्रित |
| १३ | उपमहासंचालक, युनिक आयडेंटिटी ॲथोरिटी ऑफ इंडिया, पश्चिम क्षेत्र, मुंबई (गरजेनुसार) | निमंत्रित |
| १४ | तज्ञ मंडळातील तज्ञ (गरजेनुसार)<br>टाटा इन्स्टिटयुट ऑफ फंडामेंटल रिसर्च मुंबई यांचे प्रतिनिधी (गरजेनुसार) | निमंत्रित |
| १५ | तज्ञ म्हणून प्रकल्प समन्वयक सी-डॅक, पुणे (गरजेनुसार) | निमंत्रित |
| १६ | सह/उप सचिव (ल-१) | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे.

१) शासनाच्या माहिती तंत्रज्ञान धोरणाच्या अंमलबजावणीसाठी विभागाच्या कृती कार्यक्रम आखणे.

२) माहिती तंत्रज्ञान धोरण व संगणकीकरणाचा विभागाचा कृती कार्यक्रमाचा नियतकालीक आढावा घेऊन सनियंत्रण करणे व समन्वय साधणे.

३) रुपये पाच कोटीपर्यंतच्या खर्चाच्या संगणकीकरणाच्या प्रकल्पास मान्यता देणे.

४) प्रकल्प राबविताना एखाद्या बाबतीत प्रकल्प अंमलबजावणी समितीत एकमत न झाल्यास त्याबाबत उच्चाधिकार समितीकडे निर्णयासाठी प्रस्ताव पाठविणे.

३. उपरोक्त समितीने मंजूर केलेल्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार या विभागास शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ चे परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन च्या अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७ (२) नुसार राहतील. अशा प्रकारे विभागाने मान्यता दिलेल्या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी वित्त विभाग, नियोजन विभाग किंवा माहिती तंत्रज्ञान विभाग यांच्या मान्यतेची उपरोक्त संदर्भ क्रमांक ४ व ५ नुसार आवश्यकता राहणार नाही.

४. तज्ञ मंडळाच्या सदस्यांना संदर्भ क्र. ७ नुसार रू. १०००/- एवढे मानधन (प्रवासभत्त्यांसह) अनुज्ञेय राहील. यासाठी होणारा खर्च या विभागाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००४१७२७४४२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2021.10.04 17:29:48 +05'30'

**(संजय बनकर)**
**उप सचिव**

**प्रति,**

१. सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

२. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई.
९. उपमहानिदेशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे.
१०. संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग सेंटर, नागपूर.
११. उपमहासंचालक, युनिक आयडेंटिटी ॲथोरिटी ऑफ इंडिया, पश्चिम क्षेत्र, मुंबई.
१२. सह/उपसचिव (सर्व) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई.
१७. निवड नस्ती (ल-१).